राज्य पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण योजना सन २०२१-२२ मध्ये राबविण्यासाठी रु.७५ कोटी निधी आयुक्त (कृषि) यांना वितरित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृयांयो-०५२१/ प्र.क्र.९५/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुमात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २४ नोव्हेंबर, २०२१

संदर्भ :

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक-कृयांयो-०८१८/प्र.क्र.२३१/१४अे, दि.१२ सप्टेंबर, २०१८.
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक-कृयांयो-१०२१/प्र.क्र.१७९/१४अे, दि.२६ ऑक्टोबर, २०२१.

प्रस्तावना :-

महाराष्ट्रात सुमारे ८०% शेतकरी हे अल्प व अत्यल्प भूधारक आहेत. यांत्रिकीकरणासाठी लागणारे यंत्र / औजारे शेतकरी त्यांच्या आर्थिक परिस्थितीमुळे खरेदी करु शकत नाहीत, त्यासाठी शेतकऱ्यांना आर्थिक सहाय्य करणे गरजेचे आहे. केंद्र पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण उप अभियानांतर्गत कृषी यांत्रिकीकरणाचा कार्यक्रम राज्यात राबविण्यात येतो. त्याचप्रमाणे राष्ट्रीय कृषि विकास योजना, राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान, राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान आणि एकात्मिक फलोत्पादन विकास कार्यक्रमातंर्गत सुद्धा अल्प प्रमाणात यांत्रिकीकरणाचा कार्यक्रम राबविण्यात येतो. तथापि, शेतकऱ्यांकडून कृषि यंत्र व औजारांकरिता असलेली मोठी मागणी विचारात घेऊन संदर्भाधीन शासन निर्णय दि.१२ सप्टेंबर, २०१८ अन्वये राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना राबविण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. या योजनेस संदर्भाधीन शासन निर्णय क्र. २ अन्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली असून या योजनेकरिता सन २०२१-२२ या वर्षात प्रथम टप्प्यात रु. ७५ कोटी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१. सन २०२१-२२ या वर्षात राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी रू.७५ कोटी (अक्षरी रुपये पंच्याहत्तर कोटी फक्त) आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) वितरित करण्यात येत असून सदर निधी सन २०२१-२२ करिता खालील लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्रमांक:- डी-३
२४०१- पीक संवर्धन,
११३-कृषी अभियांत्रिकी

(००) (१८) राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना,
(२४०१A९१३) ३३ अर्थसहाय्य.

२. या योजनेतंर्गत लाभार्थ्यांच्या निवडीची तसेच अनुदान वितरणाची प्रक्रिया महा डीबीटी पोर्टलद्वारे करण्यात यावी.

३. सदर योजनेंतर्गत ट्रॅक्टर या बाबीसाठी अनुसूचित जाती/जमाती, महिला, अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांसाठी किंमतीच्या ५०% किंवा रु.१.२५ लाख यापैकी कमी असेल ते आणि इतर शेतकऱ्यासाठी किंमतीच्या ४०% किंवा रु.१ लाख यापैकी कमी असेल ते या प्रमाणे अनुदान देण्यात यावे.

४. इतर बाबतीत योजनेची अंमलबजावणी करताना केंद्र पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांचे व संदर्भाधीन दि. १२ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयामधील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. सदर निधी खर्च करताना तो विहीत कार्यपद्धती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/प्रक्रियाचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/C.V.C.तत्वानुसार/प्रचलित शासन निर्णय/नियम/परिपत्रक/ तरतदुीनुसार बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही नियम/अधिकाराचा भंग होणार नाही याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

६. राज्य पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण योजनेची क्षेत्रीय स्तरावर अंमलबजावणी करण्यासाठी संचालक (नि. व गु.नि.), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन, उद्दिष्टनिहाय अंमलबजावणी विषयक सविस्तर सूचना सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.

७. सन २०२१-२२ मध्ये राज्यात सदर योजनेंतर्गत वितरीत करण्यात येणाऱ्या निधीच्या आहरण व संवितरणासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे:

| **अ.क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण अधिकारी** |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी. | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

८.  सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांचा अनौ. सं. क्र.३१०/२१/व्यय-१,दि. ०९ नोव्हेंबर, २०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२५१०५२४१०४०१ असा आहे .हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2021.11.25 11:22:02 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा मंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई-३२
२. मा.राज्यमंत्री (कृषि),मंत्रालय, मुंबई-३२
३. अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
४. अ.मु.स.(नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
५. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्रराज्य, पुणे
७. सर्व संचालक/सह संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
८. विभागीय कृषि सह संचालक (सर्व)
९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१०.महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
११.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई-३२
१३.वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) मंत्रालय, मुंबई- ३२
१४.निवड नस्ती (कार्यासन -१४अे)